राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी अनुसूचित जाती उपयोजना अंतर्गत केंद्र हिश्श्याचे अनुदान वितरीत करण्याबाबत. (लेखाशिर्ष-२२१५९८४४).

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्र. राग्रापे-२०१७/प्र.क्र.८२/(भाग-१)/पापु-१०**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, सातवा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, क्राफर्ड मार्केटजवळ, मुंबई-४०० ००१.
दिनांक: २४.०८.२०१८

**वाचा** : १. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४(अ)/पापु-७, दिनांक १७ मार्च, २०१०.
२. केंद्र शासनाचे पत्र क्र.जी-११०११/२/२०१७-वॉटर-१/३२, दिनांक १९/०५/२०१७
३. केंद्र शासनाचे पत्र क्र.डब्ल्यू-११०२०/१९७/२०१५-वॉटर-१/५२, दिनांक ०९/०८/२०१७.
४. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. विघयो-२०१०/प्र.क्र.२६/विघयो, दि. १३/०४/२०१७.
५. केंद्र शासनाचे पत्र क्र. डब्ल्यू-११०२०/१९७/२०१५-वॉटर-I/१५०, दिनांक १५.०३.२०१८

**प्रस्तावना-**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाकडून अनुसूचित जाती उपयोजना या अंतर्गत प्राप्त झालेल्या केंद्र हिश्श्याच्या अनुदानासंदर्भात आर्थिक वर्ष २०१८-१९ मध्ये मागणी क्र. वाय-०२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ७८९, अनुसूचित जातींकरीता विशेष घटक योजना, ०१, अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत योजना, (०१) (०१) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (अनुसूचित जाती उपयोजना) (केंद्र हिस्सा), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२२१५ ९८४४) या लेखाशिर्षाखाली अनुसूचित जाती उपयोजना या घटकासाठी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात केंद्र शासनाकडून उपरोक्त वाचा (५) अन्वये प्राप्त झालेला निधी राज्याच्या एकत्रित निधीत आर्थिक वर्षाच्या अखेरीस दिनांक १६ मार्च, २०१८ रोजी जमा झाल्याचे वित्त विभागाने अभिप्राय दिले आहे. सदरचा निधी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात अखेरीस प्राप्त झालेला परंतू अखर्चित राहीलेला निधी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात अंमलबजावणी यंत्रणांना ग्रामीण पाणी पूरवठा योजनांसाठी मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

आर्थिक वर्ष २०१८-१९ मध्ये नळ पाणी पुरवठा योजनांकरीता उपरोक्त घटकांसाठी २२१५ ९८४४ या लेखाशिर्षाखाली २५.४८९८ कोटी (रुपये पंचवीस कोटी अठेचाळीस लक्ष अठ्यान्नव हजार मात्र) एवढे अनुदान कव्हरेज या घटकासाठी या शासन निर्णयासोबत जोडलेल्या, विवरणपत्र-अ प्रमाणे संबंधित अंमलबजावणी यंत्रणांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे (BEAMS) पुढील अटींवर मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

**अटी:-**

(I) सदर निधी अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत लोकसंख्येच्या प्रमाणात खर्च करण्यात यावा.

(II) संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी हे अनुदान सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात केवळ अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत केंद्र शासनाने दिलेल्या सूचनेनुसार ग्रामीण भागातील अनुसूचित जातींचे प्राबल्य असलेल्या (Rural habitations having majority of/Dominated by SC population) भागांमधील नळ पाणी पुरवठा योजनांसंदर्भात कव्हरेज या घटकासाठी केंद्र शासनाने व राज्य शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांनुसार खर्च करावयाचे आहे.

(III) संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

(IV) वरील अटी/शर्तींची संबंधित अंमलबजावणी यंत्रणांकडून पुर्तता होत आहे याची शासनाला खात्री करुन घेता यावी म्हणून महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास लेखा परिक्षणाकरीता संबंधित अंमलबजावणी यंत्रणांची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील. महालेखापाल यांना त्यांचे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित अंमलबजावणी यंत्रणा संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

(V) शासन परिपत्रक, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, क्र. आरसीएन-१८९/सीआर ३०२७/२८, दिनांक ०५/०९/९० मधील सुचनेप्रमाणे सदर अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित दिनांकांना संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी विभागीय आयुक्त (विकास शाखा), यांना व कार्यासन पापु-१०/पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सादर करावे. त्याचप्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय, मुंबई/नागपूर व पापु-१० कार्यासनास सादर करावे.

(VI) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार कव्हरेज या घटकाखाली हाती घेतलेल्या योजनांसाठीचा खर्च हा ५०% केंद्र निधीतून व ५०% राज्य निधीतून करणे आवश्यक आहे.

(VII) केंद्र व राज्य हिश्श्यातून केलेल्या खर्चाची नोंद न चुकता, IMIS या प्रणालीवर पुढीलप्रमाणे नोंद झेण्यात यावी तसेच सदर नोंदी पुढीलप्रमाणे वेळोवेळी अद्ययावत करण्यात याव्यात.

क. भौतिक दृष्ट्या १००% पूर्ण परंतू आर्थिक दृष्ट्या अपूर्ण योजना.
ख. > ७५ ते < १००% भौतिक दृष्ट्या पूर्ण.
ग. > ५० ते < ७५% भौतिक दृष्ट्या पूर्ण.
घ. > २५ ते < ५०% भौतिक दृष्ट्या पूर्ण.

(VIII) तसेच BDS प्रणालीवर मुक्त केलेली रक्कम संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी त्वरीत संबंधित कोषागारातून काढण्याची कार्यवाही करावी. कोषागारातून रक्कम वेळीच न काढली गेल्यास तसेच सदर रक्कम या शासन निर्णयात नमूद केलेल्या प्रयोजनांसाठी न

वापरण्यात आल्यास त्याबाबतची संपूर्ण जबाबदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणांची राहील.

(IX) सर्वप्रथम, राज्यातील सर्व जिल्हा परिषदांना यापूर्वी उपलब्ध करून देण्यात आलेल्या निधीमधून ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी करण्यात आलेला सर्व खर्च प्रथम IMIS प्रणालीवर अद्यावत करण्यात यावा. जिल्ह्याकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावानुसार देयक तयार असलेल्या पाणी पुरवठा योजनांसाठी निधी मागणी असल्याने वितरीत करण्यात आलेला निधी सदर योजनांवरच खर्च करण्यात यावा. तसेच केंद्र हिश्श्यांतर्गत उपलब्ध करून दिलेला निधी पाणी पुरवठा योजनांना वितरीत करतांना केंद्र शासनाच्या IMIS संकेतस्थळावर खर्चाची नोंद होत असल्याची खात्री करण्यात यावी.

(X) सदर निधी सन २०१२-१३, २०१३-१४, २०१४-१५, २०१५-१६, २०१६-१७, २०१७-१८ या वर्षाच्या कृती आराखड्यात समाविष्ट असलेल्या गावांच्या योजनांसाठीच खर्च करावा. तसेच उपलब्ध करून देण्यात आलेला निधी उपयोगात आणण्यासाठी कालबध्द कार्यक्रम आखून खर्चाचे नियोजन करावे व उपयोगिता प्रमाणपत्रे शासनास वेळीच सादर करावीत.

२. यावर होणारा खर्च मागणी क्र. वाय-०२, लेखाशिर्ष २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ७८९, अनुसूचित जातींकरीता विशष घटक योजना, ०१, अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत योजना, (०१) (०१) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (अनुसूचित जाती उपयोजना) (केंद्र हिस्सा), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२२१५ ९८४४) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व तो सन २०१७-१८ साठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. वित्त विभाग परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि. ०२ एप्रिल २०१८ मधील परिच्छेद ७ ते ८ मधील अटींची तसेच सदर परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ८ मधील तपासणी सूचीतील अनुक्रमांक १ ते १० मधील अटींची पुर्तता होत आहे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक१५१/व्यय-३, दिनांक ११.०५.२०१८ च्या मान्यतेने व सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१८०८२४१६३९४४१५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vasant Bhimrao Mane

Digitally signed by Vasant Bhimrao Mane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, cn=Vasant Bhimrao Mane
Date: 2018.08.27 15:00:04 +05'30'

**(वसंत भि. माने)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)

३. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
४. नियोजन विभाग (कार्यासन-१४४३)/वित्त विभाग (व्यय-३), मंत्रालय, मुंबई.
५. सर्व विभागीय आयुक्त,
६. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवी मुंबई.
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर/औरंगाबाद/रायगड/ चंद्रपूर/ नागपूर
८. उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता) जिल्हा परिषद/कोल्हापूर/ औरंगाबाद/ रायगड/ चंद्रपूर/नागपूर.
९. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई.
१०. कार्यकारी अभियंता,ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, कोल्हापूर/औरंगाबाद/ रायगड/ चंद्रपूर/नागपूर
११. जिल्हा कोषागार अधिकारी,/ कोल्हापूर/औरंगाबाद/रायगड/चंद्रपूर/नागपूर
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई.
१४. कक्ष अधिकारी(पापु-०४) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

## विवरणपत्र-अ

| शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.राग्रापे-२०१७/प्र.क्र.८२/भाग-१/पापु-१०, दिनांक २४.८.२०१८ चे सहपत्र. | | |
|---|---|---|
| ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांसाठी निधी वितरण (केंद्र हिस्सा) (अनुसूचित जाती लेखाशिर्ष-२२१५ ९८४४) (रुपये कोटीत) | | |
| अ.क्र. | अंमलबजावणी यंत्रणेचे नांव | एकूण वितरीत रक्कम |
| १ | कोल्हापूर | ७.१२८४५ |
| २ | औरंगाबाद | ५.०००० |
| ३ | सोलापूर | ७.१२८४५ |
| ४ | नागपूर | २.४००० |
| ५ | चंद्रपूर | ३.८३२९ |
| **एकूण (रुपये पंचवीस कोटी अठेचाळीस लक्ष अठ्यान्नव हजार मात्र)** | | **२५.४८९८** |

Vasant Bhimrao Mane

Digitally signed by Vasant Bhimrao Mane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, cn=Vasant Bhimrao Mane
Date: 2018.08.27 15:00:32 +05'30'

**( वसंत भि. माने)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन